**विद्युत निरीक्षणालयातील सहाय्यक विद्युत निरीक्षक, गट-अ (राजपत्रित) या संवर्गातील अधिकाऱ्यांचे वयाच्या ५०/५५ व्या वर्षानंतर सेवा पुनर्विलोकन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय: संकिर्ण-२०२०/प्र.क्र.६६/ऊर्जा-५**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक: २४ जुलै, २०२०.

**संदर्भ:** १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एलपीएल-२०१७/प्र.क्र.२१/का.पंधरा, दि. १०/०६/२०१९.
२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. मुविनि-२०१९/प्र.क्र.१६१/ऊर्जा-५, दि. २४/०२/२०२०.
३) विभागीय पुनर्विलोकन समितीची बैठक दि. २३/०७/२०२०.

**प्रस्तावना:**

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ च्या नियम १० (४) व नियम ६५ अनुसार सार्वजनिक हितास्तव अकार्यक्षम व संशयास्पद सचोटीच्या अधिकारी / कर्मचाऱ्यांना वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्ष अर्हताकारी सेवा यापैकी जे अगोदर घडेल त्यावेळी, त्यांचे सेवा पुनर्विलोकन करून त्यांना शासन सेवेतून मुदतपूर्व सेवानिवृत्त करावे असे शासनाचे धोरण आहे. त्याअनुषंगाने सामान्य प्रशासन विभागाने संदर्भ क्र. १ येथील दि. १०/०६/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये सेवापुनर्विलोकनासंबंधी कार्यपध्दती व सर्वसाधारण सूचना विहित केल्या आहेत. त्यास अनुसरून विद्युत निरीक्षणालयातील (१) गट-अ (राजपत्रित) (अतिकालीक वरीष्ठ श्रेणी) ग्रेड वेतन रु. १००००/- व त्यावरील (२) गट-अ (राजपत्रित) (वरीष्ठ वेतन श्रेणी) ग्रेड वेतन ७६०० व त्यापेक्षा अधिक परंतु १०००० पेक्षा कमी संवर्गातील अधिकारी (३) गट-अ (राजपत्रित) (कनिष्ठ वेतन श्रेणी) ग्रेड वेतन ७६०० पेक्षा कमी संवर्गातील अधिकारी तसेच (४) गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकारी यांच्या सेवापुनर्विलोकनाकरिता संदर्भ क्र. २ येथील दि. २४/०२/२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव (ऊर्जा) यांच्या अध्यक्षतेखाली विभागीय पुनर्विलोकन समितीची स्थापना करण्यात आली आहे.

विद्युत निरीक्षणालयातील सहाय्यक विद्युत निरीक्षक, गट-अ (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा यापैकी जे अगोदर घडेल त्यावेळी त्यांचे सेवापुनर्विलोकन करण्यासाठीचा विहित प्रस्ताव प्रधान सचिव (ऊर्जा) यांच्या अध्यक्षतेखालील विभागीय पुनर्विलोकन समितीच्या दि. २३/०७/२०२० रोजीच्या बैठकीत सादर करण्यात आला. विभागीय पुनर्विलोकन समितीने सदर अधिकाऱ्यांच्या सेवेचे मुल्यमापन करून केलेल्या शिफारशी नुसार ज्या अधिकाऱ्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा यापैकी जे अगोदर घडेल त्यावेळी सेवेत राहण्यासाठी पात्र ठरविले आहे त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

विभागीय पुनर्विलोकन समितीच्या दि. २३/०७/२०२० रोजी झालेल्या बैठकीतील शिफारशीस अनुसरुन विद्युत निरीक्षणालयातील सहाय्यक विद्युत निरीक्षक, गट-अ (राजपत्रित) या संवर्गातील सोबत जोडलेल्या प्रपत्रामध्ये नमूद केलेल्या अधिकाऱ्यांची सेवा त्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा यापैकी जे अगोदर घडेल त्यानंतर चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सोबत जोडलेल्या प्रपत्रामध्ये नमूद अधिकाऱ्यांची सेवा त्यांच्या वयाच्या ५०/५५ वर्षानंतर किंवा अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण झालेनंतर पुढे चालू ठेवण्यास मान्यता मिळाल्याबाबतची नोंद त्यांच्या सेवापुस्तकात घेण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००७२७१४३९२५६०१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Pundlik Badgeri

Digitally signed by Prashant Pundlik Badgeri
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Industry Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=07ae22a8e7fa4047ce6ff816d85e77eec14db9926b325a140acf9b28bb990786, serialNumber=ec955e2d360e1fddb6abac58a907419053beeceb5dbac48a78c89c588ff71bef, cn=Prashant Pundlik Badgeri
Date: 2020.07.27 15:34:43 +05'30'

**(प्रशांत पुं. बडगेरी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), १/२, मुंबई/नागपूर.
२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई/नागपूर.
३) मुख्य विद्युत निरीक्षक, ३ रा मजला, प्रशासकीय इमारत, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबूर (पूर्व), मुंबई-४०००७१.
४) अधीक्षक अभियंता, प्रादेशिक विद्युत निरीक्षण मंडळ, मुंबई/पुणे/औरंगाबाद/नागपूर.
५) संबंधित सहाय्यक विद्युत निरीक्षक (मुख्य विद्युत निरीक्षक यांच्यामार्फत)
६) निवडनस्ती (ऊर्जा-५)

शासन निर्णय: संकिर्ण-२०२०/प्र.क्र. ६६/ऊर्जा-५, दिनांक २४/०७/२०२० सोबतचे प्रपत्र
विद्युत निरीक्षणालयातील सहाय्यक विद्युत निरीक्षक, गट-अ (राजपत्रित) या संवर्गातील वयाच्या ५०/५५ व्या वर्षानंतर किंवा अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण झालेनंतर सेवा पुढे चालू ठेवण्यास पात्र ठरलेल्या अधिकाऱ्यांची यादी.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव |
|---|---|
| १ | श्री.विजय नारायणराव शिंगणे |
| २ | श्री. संदिप भास्कर महाजन |
| ३ | श्री. फैजअली मेहबूब मुल्ला |
| ४ | श्री. चंद्रकांत तुकाराम थोरात |
| ५ | श्री. रामकृष्ण सिताराम देवकर |
| ६ | श्री. रविंद्र रमांकांत गिरी |
| ७ | श्रीम. विजया विजय भालेराव |

**********************